प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन ,महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट -अ यांच्या सर्वसाधारण बदल्या सन -२०१४

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांकः बदली-१११४/प्रक्र. ८७/१४/तंशि-७

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: २५ जुलै, २०१४

**शासन निर्णय**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम - २००५ मधील तरतुदीनुसार तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट- अ, प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन या संवर्गातील अधिका-यांच्या सर्वसाधारण बदल्या सोबत जोडलेल्या विवरणपत्र- अ प्रमाणे करण्यात येत आहेत.

०२. प्रशासकीय कारणास्तव बदली झालेल्या प्राचार्यांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील. विनंती बदली असलेल्या प्राचार्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

०३. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम - २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-याच्या मंजूरीने सदर बदल्या करण्यात येत आहेत.

०४. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

**०५. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरीता खालील सूचनांचे काटकोरपणे पालन करावे.**

(१) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर संबंधित प्राचार्यांनी सध्या कार्यरत असलेल्या संस्थेमधून तात्काळ कार्यमुक्त होऊन बदली झालेल्या संस्थेत रुजू व्हावे. सर्व प्राचार्यांनी पर्यायी अधिकारी हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या संस्थेत उशीरात उशीरा आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत म्हणजेच दिनांक २४ ऑगस्ट,२०१४ पूर्वी कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रुजू व्हावे.

(२) पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही.

(३) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

(४) बदली झालेल्या प्राचार्यांची कोणतीही रजा प्रशासकीय विभागाच्या पुर्वमान्यतेशिवाय मंजूर करण्यात येणार नाही .

(५) सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व प्राचार्यांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंतचे अथवा **जास्तीतजास्त दिनांक २४ ऑगस्ट, २०१४ पर्यंतचे** वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या संस्थेने काढावे. दिनांक २५ ऑगस्ट, २०१४ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या संस्थेकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित अधिकारी बदलीच्या संस्थेत रुजु झाल्यानंतर बदलीनंतरच्या संस्थेने काढावे. दिनांक २५ ऑगस्ट, २०१४ पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या संस्थेतील आहरण व सवितरण अधिका-याने अदा केल्यास त्यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.

(६) बदली झालेल्या प्राचार्यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची जबाबदारी वैयक्तीकरित्या संबंधित संस्था प्रमुखांची राहील. याबाबतचा पाठपुरावा संबंधित विभागीय सहसंचालकांनी करावा, तसेच याबाबत कार्यपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून **२ महिन्यात** संचालक, तंत्र शिक्षण यांनी न चुकता शासनास सादर करावा.

(७) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२५१७४६२२३००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Panditrao Shastri

Digitally signed by Sudhir Panditrao Shastri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sudhir Panditrao Shastri
Date: 2014.07.25 18:57:22 +05'30'

( सुधीर पं. शास्त्री)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

संबधीत प्राचार्य. **(संचालक तंत्र शिक्षण यांचे मार्फत)**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान सचिव , उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.

४. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई.

६. सह संचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती व नागपूर.

७. संबधीत संस्थाप्रमुख, (संचालक, तंत्रशिक्षण यांचे मार्फत).

८.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर, महाराष्ट्र १/२.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ/गडचिरोली/परभणी/नागपूर.

वरील अ.क्र. ९ यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या सर्व अधिकाऱ्यांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यतचे अथवा जास्तीत-जास्त **दिनांक २४ ऑगस्ट, २०१४** पर्यतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या संस्थेमार्फत अदा करावयाचे आहे. दिनांक २५ ऑगस्ट, २०१४ नंतरचे वेतन बदली झालेल्या संस्थेमार्फत अदा करावयाचे आहे. सदर सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१०. निवड नस्ती- तांशि-७

शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्रमांक. बदली-१११४/प्रक्र. ८७/१४/तंशि-७

दिनांक: २५ जुलै, २०१४ सोबतचे

विवरणपत्र अ

| अ.क्र. | प्राचार्याचे नांव व सध्या कार्यरत असलेल्या संस्थेचे ठिकाण | बदलीचे ठिकाण | बदलीचे कारण |
|---|---|---|---|
| १. | श्री. राजेंद्र पांडुरंग मोगरे, शासकीय तंत्रनिकेतन, यवतमाळ | शासकीय तंत्रनिकेतन, गडचिरोली येथे श्री. नरेंद्र नामदेव शेंडे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या प्राचार्य पदावर. | प्रशासकीय बदली |
| २. | श्री. नरेंद्र नामदेव शेंडे, शासकीय तंत्रनिकेतन, गडचिरोली | शासकीय तंत्रनिकेतन,यवतमाळ येथे श्री. राजेंद्र पांडुरंग मोगरे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या प्राचार्य पदावर. | प्रशासकीय बदली |
| ३. | श्री. चंद्रशेखर एस. थोरात, शासकीय तंत्रनिकेतन, जिंतूर | शासकीय तंत्रनिकेतन, नागपूर येथे रिक्त असलेल्या प्राचार्य पदावर. | विनंती बदली |

*****